अखिल भारतीय आयुविज्ञान संस्था, नागपूर यांना ग्रामीण आरोग्य प्रशिक्षण केंद्र प्रस्थापित करणे व आरोग्य सेवा देण्याकरीता प्राथमिक आरोग्य केंद्र बेला, ता.उमरेड, जि.नागपूर येथील खाटा शैक्षणिक प्रयोजनासाठी नि:शुल्क वापरण्यास मंजूरी देणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

## सार्वजनिक आरोग्य विभाग

## शासन निर्णय क्रमांकः खाटावा -२०२० /प्र.क्र.३७/आरोग्य-३

१० वा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल इमारत,
लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई-४०० ००१.
तारीख: २३ जुलै, २०२०

वाचा -

१) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग,क्रमांक-एचएसजी १६९०/प्र.क्र.९६/आरोग्य-३, दिनांक- ०३.०८.१९९०.
२) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग,क्रमांक-१२१२/६३९/प्र.क्र.११७/आरोग्य-४, दिनांक- १८.०९.२०१२.
३) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग,क्रमांक-संकिर्ण २०१३/प्र.क्र.३०७/आरोग्य-३, दिनांक- ०३.०८.२०१३.
४) आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्रमांक- संआसे/कक्ष-७अ/टे-७/ प्राआके/बेला/प्रशिक्षण केंद्र/नागपूर/४९७३-४९७४ /२०१९, दिनांक-०७.१०.२०१९.

प्रस्तावना -

अखिल भारतीय आयुविज्ञान संस्था, नागपूर यांना ग्रामीण आरोग्य प्रशिक्षण केंद्र प्रस्थापित करणे व आरोग्य सेवा देण्याकरीता प्राथमिक आरोग्य केंद्र बेला, ता.उमरेड, जि.नागपूर येथील खाटा शैक्षणिक प्रयोजनाकरीता वापरण्यास परवानगी देण्याबाबतचा प्रस्ताव संदर्भ क्र.३ अन्वये प्राप्त झालेला प्रस्ताव शासनाच्या विचारधीन होता.याबाबत पुढील प्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय-**

अखिल भारतीय आयुविज्ञान संस्था, नागपूर ही केंद्र शासनाच्या अखत्यारीतील संस्था आहे. त्यामुळे अखिल भारतीय आयुविज्ञान संस्था, नागपूर यांच्याकडून उत्तम आरोग्य सेवा जनतेला देण्याकरीता सदर संस्थेस प्राथमिक आरोग्य केंद्र बेला, ता.उमरेड, जि.नागपूर येथील खाटा शैक्षणिक प्रयोजनाकरीता नि:शुल्क वापरण्यास मंजूरी देण्यात येत आहे.

२. शासन निर्णय दिनांक १८ सप्टेंबर, २०१२ मधील सर्वसाधारण अटी लागू राहतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००६१२१४४२७६५१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Roshani Dinesh Kadam Patil
DN: CN = Roshani Dinesh Kadam Patil, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Public Health Department
Date: 2020.07.23 14:53:28 +05'30'

**(रो.दि.कदम पाटील)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा परिक्षा) ( लेखा व अनुज्ञेयता), मुंबई /नागपूर.
२. संचालक-१, आरोग्य सेवा, मुंबई
३. सहसंचालक,आरोग्य सेवा (रुग्णालये-राज्यस्तर), मुंबई.
४. सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन) पुणे
५. उपसंचालक, आरोग्य सेवा, नागपूर मंडळ, नागपूर.
६. जिल्हा शल्य चिकित्सक, नागपूर.
७. जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर.
८. वैदयकीय अधिक्षक प्राथमिक आरोग्य केंद्र बेला, ता.उमरेड, जि.नागपूर.
९. वित्त विभाग (व्यय-१३), मंत्रालय, मुंबई.
१०. निवडनस्ती (आरोग्य-३)